सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात विभागीय संदर्भ सेवा रूग्णालय,नाशिक करिता लेखाशिर्ष २२१० के०८८ अंतर्गत ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर) Inj. Centhaquine Citrate १.०mg औषधी खरेदी करण्यास रु.४९,२५,०००/- इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा -१२२४/प्र.क्र.४१/आरोग्य-८**

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २५ जुलै, २०२४.

**वाचा :-**

१. सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-४/नस्ती क्र.१९/विसंसेरु अमरावती नाशिक /२९२१-२३/२०२४/ Inj. Centhaquine Citrate १.० mg /, दि.२८.०२.२०२४
२. सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-४/नस्ती क्र.१९/विसंसेरु अमरावती नाशिक /१०९०५-०६/२०२४/ Inj. Centhaquine Citrate १.० mg /, दि.०९.०५.२०२४.
३. शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.प्रशामा-१२२४/प्र.क्र.४१/आरोग्य-८, दि.१२.०६.२०२४
४. शासन पत्र क्र.एसडीएल-२०१९/प्र.क्र.१८१/आरोग्य-८, दि.२९.१२.२०२३

**प्रस्तावना:-**

सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांनी वाचा मधील अनुक्रमांक क्र.०१ व ०२ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये विभागीय संदर्भ सेवा रूग्णालय नाशिक व अमरावती पैकी मुंबई पदवीधर, कोकण विभाग पदवीधर, नाशिक विभाग शिक्षक तसेच मुंबई शिक्षक मतदारसंघ येथील जागांकरिता निवडणूक होत असल्याने या विभागात आदर्श आचारसंहिता लागू करण्यात आली होती. त्यामुळे विभागीय संदर्भ सेवा रूग्णालय नाशिक वगळून विभागीय संदर्भ सेवा रूग्णालय अमरावती करिता लेखाशिर्ष २२१० के०८८ अंतर्गत अंतर्गत ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या उद्दीष्टाखाली Inj. Centhaquine Citrate १.० mg औषध खरेदी करण्यास वाचा मधील अनुक्रमांक ०३ येथील शासन निर्णय दि.१२.०६.२०२४ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

२. आता, उपरोक्त निवडणूकीसंदर्भातील आदर्श आचारसंहिता संपुष्टात आली असल्याने, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिककरिता Inj. Centhaquine Citrate १.० mg या औषधाची लेखाशिर्ष २२१० के०८८ अंतर्गत ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या उद्दीष्टाखाली रु.४९,२५,०००/- इतक्या रक्कमेच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

३. (१) सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक करिता Inj. Centhaquine Citrate १.० mg या औषधाची लेखाशिर्ष २२१० के०८८ अंतर्गत ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या उद्दीष्टाखाली रु.४९,२५,०००/- इतका खर्च अपेक्षित असून सदर खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उक्त लेखाशिर्षांतर्गत मंजुर व उपलब्ध असलेल्या अनुदानातुन भागविण्यात येणार आहे.

(२) सदर खरेदीसाठीच्या अनुदानाचा व खरेदीचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

**विवरणपत्र**

**अ- अनुदानाचा तपशिल**

**(रक्कम रुपयांत)**

| अ.क्र. | लेखाशिर्ष | खरेदीचा तपशिल | प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव एकूण किंमत (रु.) | उपलब्ध निधी |
|---|---|---|---|---|
| १ | "मागणी क्र. आर-१, २२१०, वैद्यकिय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (०९) महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, (०९) (०२) महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरणामार्फत औषधे, औषधी साहित्य, यंत्रसामग्री व साधन सामग्री खरेदी ३१ - सहायक अनुदाने ( वेतनेतर) (कार्यक्रम) **(२२१० के ०८८)"** | Inj. Centhaquine Citrate १.० mg | रु.४९,२५,००० | सन २०२४-२५ पुरवणी मागणी (पावसाळी अधिवेशन) |

## विवरणपत्र
## ब-खरेदीचा तपशिल

(रक्कम रुपयांत)

| अ.क्र. | लेखाशिर्ष | खरेदीचा तपशील | अंदाजित दर प्रति नग | आवश्यक नग संख्या | प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव |
|---|---|---|---|---|---|
| १ | "मागणी क्र. आर-१, २२१०, वैद्यकिय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (०९) महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, (०९) (०२) महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरणामार्फत औषधे, औषधी साहित्य, यंत्रसामग्री व साधन सामग्री खरेदी ३१ - सहायक अनुदाने ( वेतनेतर) (कार्यक्रम) (२२१० के ०८८)" | Inj. Centhaquine Citrate १.० mg | ९८५० | ५०० | ४९,२५,००० |
| **एकुण** | | | | | **४९,२५,०००** |

**४.** सदर प्रस्तावासंदर्भात आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई यांनी प्रस्तावासोबत संबंधित उत्पादकाने दिनांक ०९.०४.२०२४ रोजीच्या पत्रान्वये Inj. Centhaquine Citrate १.० mg हे त्यांच्या कंपनीच्या मालकीचे औषध असल्याचे एकलस्त्रोत प्रमाणपत्र (Proprietary Article Certificate) व Patent Certificate (Patent Number २८२१५५) सादर केले आहे. तसेच महाराष्ट्र वैद्यकिय वस्तू खरेदी प्राधिकरणाने In. Centhaquine Citrate "एकलस्त्रोत पद्धतीने" थेट स्वरूपात खरेदीची कार्यवाही करण्याकरीता उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय दिनांक ०१/१२/२०१६ मधील परिच्छेद क्र. ३.२.६ (एकल स्त्रोत खरेदी) मध्ये नमुद केल्यानुसार परिशिष्ट-१३ चे स्वाक्षांकित प्रमाणपत्र सादर केले आहे.

**५.** सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये- राज्यस्तर), मुंबई यांनी सादर केलेल्या एकल स्त्रोत खरेदी प्रस्तावानुसार, सदर खरेदी एकल स्त्रोत पध्दतीने करण्यासाठी खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

(१) सदरहू औषधे यांची आवश्यकता खातरजमा/मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

(२) सदरहू औषधे, यांचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच या बाबींचीच खरेदी करण्यात यावी.

(३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित पध्दतीने खरेदी प्रक्रिया राबविण्याची संपुर्ण जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैदयकीय वस्तू खरेदी प्राधिकरण,मुंबई व सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये- राज्यस्तर), मुंबई यांची राहील.

(४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

(५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

(६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

(७) सदर खरेदीसाठी अंदाजे रु.४९,२५,००० /- इतका खर्च अपेक्षित असुन सदर खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात लेखाशिर्ष २२१० के०८८ अंतर्गत ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या उद्दीष्टाखाली सन २०२४-२५ मध्ये पावसाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीतुन भागविण्यात यावा. सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी. तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

(८) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

(९) या कामी होणारा खर्च, "मागणी क्र. आर-१, २२१०, वैद्यकिय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (०९) महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, (०९) (०२) महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरणामार्फत औषधे, औषधी साहित्य, यंत्रसामग्री व साधन सामग्री खरेदी ३१ - सहायक अनुदाने ( वेतनेतर) (कार्यक्रम) (२२१० के ०८८)” या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतुन भागविण्यात येऊन तो सदरहू लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

(१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

(११) सदर खरेदी ही महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई यांचे मार्फत करण्यात यावी. प्राधिकरणाने प्रस्तुत निविदा प्रक्रिया पुर्ण झाल्यानंतर त्याबाबतचा तपशील शासनास सादर करावा.

६. उपरोक्त परिच्छेद क्र.५ मधील अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी, आयुक्त,आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई , मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैदयकीय वस्तू खरेदी प्राधिकरण,मुंबई व सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये- राज्यस्तर), मुंबई यांची राहील.

७. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७२५१५१९२७२८१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=406CB152E109154A7466C0050F88E5A437E17838973824687653A5E8D144B72B, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2024.07.26 11:33:16 +05'30'

**(विकास तु. कदम)**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी , महाराष्ट्र वैदयकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई.
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
४) सह संचालक,आरोग्य सेवा,रुग्णालये (राज्यस्तर),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई.
५) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई.
६) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई.
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता),मुंबई.
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता),नागपूर.
९) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
११) निवडनस्ती (आरोग्य-८)